**शेतक-यांना खरीप हंगामासाठी**
**कर्ज मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्रमांक: संकीर्ण ०६१७/प्र.क्र.११७ /२-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० जून, २०१७.

**वाचा** :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकीर्ण ०६१७/प्र.क्र.११७ /२-स, दि.१४ जून २०१७

**प्रस्तावना : -**

दि.३० जून २०१६ रोजी थकबाकीदार असलेल्या शेतक-यांना खरीप पिकासाठी निविष्ठा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रु.१०,०००/- च्या मर्यादेपर्यंत तातडीने कर्ज देण्याचे निदेश सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका तसेच व्यापारी बँकाना "वाचा" येथील शासन निर्णयान्वये देण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद क्रमांक १ मधील अ.क्र.६ मध्ये अपात्रतेचे निकष नमूद करण्यात आले आहेत. या निकषात मधील अपात्रतेच्या निकषात काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्र : -**

उपरोक्त शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकीर्ण ०६१७/प्र.क्र.११७ /२-स, दि.१४ जून २०१७ मधील परिच्छेद क्र.१ अ.क्र.६ मधील (I) ते (x) ऐवजी खालील निकष विचारात घेण्यात यावेत:

i) महाराष्ट्र राज्यातील आजी/माजी मंत्री/राज्यमंत्री, आजी/माजी खासदार/राज्यसभा सदस्य, आजी/माजी विधानसभा/विधान परिषद सदस्य
ii) जिल्हा परिषद सदस्य, महानगरपालिका यांचे सदस्य
iii) केंद्र व राज्य शासकीय/ निमशासकीय अधिकारी/ कर्मचारी, शासन अनुदानित सर्व महाविद्यालय व शाळांचे प्राध्यापक, शिक्षक, केंद्र/ राज्य शासन अर्थसहाय्यित संस्थांचे अधिकारी/ कर्मचारी ज्यांचे वार्षिक ढोबळ उत्पन्न रुपये चार लाखापेक्षा जास्त आहे.
iv) आयकर रिटर्न भरणारी व्यक्ती ज्यांचे वार्षिक ढोबळ उत्पन्न रुपये चार लाखाचे वर आहे.
v) निवृत्तीवेतनधारक व्यक्ती ज्यांचे मासिक निवृत्तीवेतन रुपये पंधरा हजारापेक्षा जास्त आहे (माजी सैनिक वगळून).
vi) डॉक्टर्स/ वकील/चार्टर्ड व कॉस्ट अकाऊंटंट/ अभियंता/ व्यावसायिक ज्यांचे वार्षिक ढोबळ उत्पन्न रुपये चार लाखाचे वर आहे.
vii) सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, स्थानिक नगर पालिका यासारख्या कोणत्याही शासकीय / निमशासकीय संस्थेकडे नोंदणीकृत सेवा पुरवठादार आणि कंत्राटदार ज्यांचे वार्षिक ढोबळ उत्पन्न रुपये चार लाखाचे वर आहे.

viii) कृषि उत्पन्न बाजार समिती, सहकारी साखर कारखाना, सहकारी सुतगिरणी, नागरी सहकारी संस्था, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व सहकारी दूध संघ यांचे अधिकारी व पदाधिकारी (अध्यक्ष व उपाध्यक्ष) आणि मजूर सहकारी संस्थेचे अध्यक्ष ज्यांचे वार्षिक ढोबळ उत्पन्न रुपये चार लाखापेक्षा जास्त आहे.

ix) रुपये चार लाखापेक्षा जास्त ढोबळ उत्पन्न असलेली सेवा कर भरण्यासाठी नोंदणीकृत व्यक्ती

x) मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८ नुसार परवानाधारक व्यक्ती ज्यांची वार्षिक उलाढाल रुपये दहा लाखापेक्षा जास्त आहे.

सदर शासन शुध्दीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०६२०२०१९५९३००२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.06.20 20:17:48 +05'30'

**( दिपक म. राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
३) मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा. प्रधान सचिव (ग्रामविकास ), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मा. प्रधान सचिव (कृषि), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
९) मा. विभागीय आयुक्त (सर्व)
१०) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे
१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था ,
१५) सर्व जिल्हयाचे मुख्य प्रबंधक तथा जिल्हा अग्रणी बँक अधिकारी
१६) निवड नस्ती.